नवेगाव-नागझिरा व्याघ्र राखीव क्षेत्र म्हणून घोषित झाल्याने क्षेत्राचे उपसंचालक ,नागझिरा व्याघ्र राखीव क्षेत्र स्थित साकोली या पदाला "आहरण व संवितरण अधिकारी "म्हणून घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम - २०१४/प्र.क्र.२४१/फ-२**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक : २८ एप्रिल, २०१५**

<u>वाचा :-</u> १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा- प्र.५, दि.०४.०१.२००६

२) महसूल व वन विभाग, शासन आदेश, क्र.एमएफएस-२०१४/प्र.क्र.१४६/फ-८, दि. १३.०६.२०१४.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र.क्र. कक्ष-२ (१)/असं/प्र.क्र.१५/भाग-२/२४३/२०१४-१५, दि. २६.०९.२०१४.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३(ब) आस्था/१४-१५/आवसं/५६५, दि. ०६.०८.२०१४.

**<u>प्रस्तावना</u> -**

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५ (३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

शासन आदेश, महसूल व वन विभाग,क्रमांक एमएफएस-२०१४/प्र.क्र.१४६/फ-८, दि.१३.०६.२०१४ अन्वये विभागीय वन अधिकारी, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प-१, चंद्रपूर हे पद, सदर पदावर कार्यरत असलेल्या श्री. ए.एस.खुणे यांच्यासह, वनसंरक्षक (वन्यजीव), गोंदिया यांच्या अधिनस्त नवेगाव नागझिरा व्याघ्र राखीव क्षेत्राच्या नियंत्रणाकरीता वर्ग करण्यात आले आहे.

याप्रमाणे वर्ग करण्यात येणाऱ्या पदाचे पदनाम उपसंचालक, नागझिरा व्याघ्र राखीव क्षेत्र स्थित साकोली असे राहणार आहे. सदर पदनामास आहरण संवितरण अधिकारी म्हणून नानिर्देशित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपुर यांनी दि.२६.०९.२०१४ च्या पत्रान्वये प्रस्तावीत केल्याप्रमाणे खालील अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | वनवृत्त | आहरण व संवितरण अधिकारी यांचे पदनाम | मुख्यालय | कोषागार/ उप कोषागार कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर | उपसंचालक, नागझिरा राखीव क्षेत्र स्थित साकोली | साकोली | उप कोषागार, साकोली, जि.भंडारा |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२८१५५८२०८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.04.28 16:09:52 +05'30'

(द. ल. थोरात)
सह सचिव,
महसूल व वन विभाग

**प्रत :**

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्यआयोजना, पश्चिम पुणे.

४. वनसंरक्षक, (वन्यजीव), गोंदिया

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (कार्मिक), नागपूर

६.वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर/मुंबई

७.महालेखापाल (लेखा परीक्षा)/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य.१/२,मुंबई/नागपूर (त्यांना विनंती करण्यात येते कि,महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड -१ मधिल नियम १५(२) व १५(३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पूढील कार्यवाही करण्यात यावी.

८.संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.

९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे.

१०.सहसंचालक, (तांत्रिक) लेखा कोषागार, मुंबई.

११.वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र.५, मंत्रालय, मुंबई.

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा/गोंदिया.

१३. उपकोषागार अधिकारी, साकोली, जि.भंडारा.

१४. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.

१५. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.